**पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड येथील दुरुस्ती कामास/ अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दुरुस्ती सुप्रमा-२०२४/प्र.क्र.१७५/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २३ ऑगस्ट, २०२४.

वाचा:

१. शासन निर्णय मृद व जलसंधारण विभाग क्र.कोपबं -२०२२/प्र.क्र.०१/ जल-०१, दि.११.०२.२०२२.
२. शासन निर्णय मृद व जलसंधारण विभाग क्र.लपायो -२०२२/प्र.क्र.०२/ जल-०१, दि.११.०२.२०२२
३. मृद व जलसंधारण विभागाचा शा.नि. क्र. संकिर्ण २०२१/प्र.क्र. २८७(भाग-३)/जल १, दि. २४.०१.२०२४
४. मृद व जलसंधारण विभाग शा. नि. क्रः दुरुस्ती-२०२३/ प्र.क्र. ७३७/ जल-१ दिः २२.१२.२०२३
५. अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे यांचे पत्र क्र. प्रशा-२/२०८९/२, दि. १४.०३.२०२४

**प्रस्तावना**

पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड या योजनेस संदर्भिय शासन निर्णय क्रः ४ अन्वये रु. ४७.०१ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. दि. ०३.०३.२०२४ रोजीच्या निरिक्षण टिपणीनुसार दगडी अस्तरीकरणाचे अतिरिक्त काम व संपुर्ण तलावाच्या बाजुने Guard Stone बसवणे या बाबींचा समावेश करण्यात आलेला आहे. त्यामुळे उपरोक्त योजनेच्या किंमतीत १०% पेक्षा अधिक वाढत असल्यामुळे सुधारीत प्रशासकीय मान्यतेची गरज आहे. त्यानुसार पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड या योजनेचा सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आलेला आहे. सदर योजनेची मूळ संकल्पित पाणीसाठा १२४.९९ स.घ.मी व मूळ सिंचन क्षमता २६.३१ हेक्टर इतकी आहे. सदर योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान केल्यास स्थानिक शेतकरी वर्गास फ़ायदा होणार आहे. सदर बाबीचा विचार करून प्रस्तावित कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव, ता. आष्टी, जि. बीड या दुरुस्ती योजनेची सुधारीत अंदाजपत्रकीय किंमत **रुपये ६३,९०,०००/- (अक्षरी रुपये त्रेसष्ट लक्ष नव्वद हजार फ़क्त)** इतकी आहे. सदर योजनेच्या मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत हि ४७.०१ लक्ष इतकी असुन झालेली वाढ ही रुपये १६.८९ लक्ष इतकी आहे पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड या योजनेचा सुधारीत किंमतीबाबतचा गोषवारा सोबत जोडण्यात आलेल्या प्रपत्रात नमुद आहे. या किंमतीच्या अंदाजपत्रकांना खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. वरील योजनेच्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयानुसार लागू असलेल्या सर्व अटी व शर्तींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.
२. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानूसार काम पूर्ण करण्यात यावे.
३. सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यावर क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रीय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही.
४. शासन संदर्भीय पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुसरून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करत आहे. योजनांची द्विरुक्ती झाल्यास त्यास प्रादेशिक व विभागीय कार्यालय जबाबदार राहतील.
५. तसेच वित्त विभागाने खालील अटींच्या अधिन राहुन मान्यता देण्यात आलेली आहे. सदर अटींची पुर्तता करणेची जबाबदारी जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहिल,
    i. मुळ प्रशासकीय मान्यतेत नमूद केलेल्या इतर सर्व अटी सुधारित प्रशासकीय मान्यतेबाबतही लागू होतील.
    ii. प्रस्तुत योजना सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीमध्ये पूर्ण करण्याची दक्षता विभागाने घ्यावी. शासन मान्यतेशिवाय नवीन घटकांचा समावेश योजनेमध्ये करण्यात येऊ नये.
    iii. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर विभागाने खर्च करु नये.
    iv. सदर योजनेसंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल किंवा ज्यामुळे कोणतीही अनियमितता होण्याची शक्यता असेल अशा कोण्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही वा अशी कोणतीही सहमती/मान्यता शासनाने प्रस्तूत योजनेबाबत दिलेली नाही.
    v. विभागाने प्रचलित शासन निर्णय नियम, मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी विभागाची राहील.
    vi. प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही

२.० या योजनेच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**० ते १०० हे. सिंचन क्षमतेच्या योजनांकरिता लेखाशिर्षः-**

**लेखाशिर्ष ४७०२-ए-०४६**

**(०१)(०१)लहान पाटबंधारे योजना**

**० ते १०० हेक्टर सिंचन क्षमता परिरक्षण व दुरुस्ती (कार्यक्रम)**

**५३, मोठी बांधकामे**

३.० सदरहू योजनांच्या दुरुस्तीच्या कामास वरील लेखाशिर्षांतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४.० प्रस्तुत आदेश प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८२३१८०३५४३९२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.08.23 18:18:55 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मंबई.
२) मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा.संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव.
८) मा.मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९) सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई.

११) आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.

१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.

१३) अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.

१४) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर.

१५) प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर.

१६) कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७) निवड नस्ती (जल-१)

मृद व जलसंधारण विभाग
जोडपत्र 'अ'

शासन निर्णय क्रमांक: दुरुस्ती/सुप्रमा-२०२४/प्र.क्र.१७५/जल-१, दिनांक: २३ ऑगस्ट, २०२४.

पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड येथील दुरुस्ती कामास/ अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत गोषवाराः-

| अक्र. | शीर्ष/उपशीर्ष कामे | पिंपळेश्वर महादेव मंदिर जुना तलाव ता. आष्टी जि. बीड |
|---|---|---|
| १. | A- Preliminary | ०.०० |
| २. | B- Lands | ०.०० |
| ३. | C- Works | ६२,६६,०००.०० |
| ४. | O- Miscellaneous | ०.०० |
| ५. | P-Maintenance | ०.०० |
| ६. | R- Communication | ०.०० |
| | एकूण | ६२,६६,०००.०० |
| ७. | २ % ETP | १,२५,३२०.०० |
| | एकुण | ६३,९१,३२०.०० |
| | **एकुण (Say)** | **६३,९०,०००.००** |

(अक्षरी रुपये त्रेसष्ट लक्ष नव्वद हजार फ़क्त)

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.08.23 18:19:16 +05'30'

(प्र. नि. पाटील)
कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव
महाराष्ट्र शासन